**नाशिक महसूल विभाग विकास कार्यक्रमांतर्गत**
**(खानदेश विकास पॅकेज)नंदुरबार जिल्हयात**
**सन २०१०-११ करीता आदिवासी उपयोजनेतून**
**"शेततळे" योजना राबविण्यास मंजुरी**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवि-२००९/प्र.क्र. ७४ /जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ९ मार्च, २०११**

**संदर्भ :-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-१००९/ प्र.क्र.१११/२-अे, दि. १२.८.२००९.

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. २००९/प्र.क्र.१२/का-१४२०, दि. २७.८.२००९

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. टिएसपी-२०१०/ प्र.क्र. १३२/ का.६, दि. २८.७.२०१०

४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. पूरक- २०१०/प्र.क्र.२४० / अर्थसंकल्प -३, दि. ३० डिसेंबर, २०१०

५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१०/प्र.क्र. २१६/का-६, दि. ७.१.२०११.

६) संचालक,मृदसाधारण व पाणलोट क्षेत्रव्यवस्थापन,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.मृदस/राकृयो/मृद-४/ /वि.पा.वि.मि. / ७०१/२०१०/ दि. २/२ /२०१०.

**प्रस्तावना :**

नाशिक महसूल विभागाच्या विकास कार्यक्रमाबाबत दि.२२ जुलै, २००९ रोजी नाशिक येथे झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील दि. २७.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये "नाशिक विभाग विकास कार्यक्रम-२००९" हा कार्यक्रम शासनाने मंजूर केला आहे. त्याअंतर्गत कृषि विभागाशी संबंधित योजनांचा खानदेश विकास पॅकेज अंतर्गत समावेश असून, त्याप्रमाणे कृषि व पदुम विभागाने संदर्भ क्र. (१) येथील दि. १२.८.२००९ च्या शासन निर्णयातील अनुक्रमांक -४ नुसार नंदूरबार जिल्हयासाठी आदिवासी उपयोजनेंतर्गत रु. २.०० कोटीच्या योजनेस मान्यता दिली आहे.

**२.** संचालक, (मृदसंधारण) यांनी संदर्भ क्र.६ येथील दि.२.२.२०१० च्या पत्रान्वये नाशिक विभाग विकास कार्यक्रमांच्या खानदेश विकास पॅकेज अंतर्गत नंदूरबार जिल्हयासाठी आदिवासी उपयोजनेतून सन २००९-१० ते सन २०११-१२ या तीन वर्षासाठी ४०० शेततळे निर्माण करण्यास व त्याकरीता वर्षनिहाय रु.५०.०० लाख, रु.७०.०० लाख, व रु. ८०.०० लाख याप्रमाणे एकूण रु. २.०० कोटी इतका निधी उपलब्ध करण्यासंबंधीचा प्रस्ताव मान्यतेसाठी सादर केला होता.

त्यानुसार सन २०१०-११ या चालु आर्थिक वर्षाकरीता रु.७०.०० लाख नियतव्यय उपलब्ध करुन घेण्यासाठी रु. १०००/- एवढी लाक्षणिक पुरक मागणीचा प्रस्ताव विधीमंडळास सादर करण्यात आला होता. सदर पुरक मागणीस विधीमंडळाने मान्यता दिली असून, त्याप्रमाणे आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र. ५ येथील दि.७.१.२०११ च्या शासन निर्णयान्वये मागणी क्र.टी-६ अंतर्गत मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास या अर्थशिर्षाखाली या प्रशासकीय विभागास रु.७०.०० लाखाची तरतुद सुपुर्द करुन कॅशफ्लोप्रमाणे खर्च करण्यास मंजूरी दिली आहे. ही बाब लक्षात घेता, नंदूरबार जिल्हयात आदिवासी उप योजनेतंर्गत "शेततळे" ही योजना राबविण्यास मान्यता व त्याकरीता रु.७०.०० लाख इतका निधी संचालक, (मृदसंधारण) यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सदर शासन निर्णयान्वये नाशिक महसूल विभागाच्या विकास कार्यक्रमांतर्गत ( खानदेश विकास पॅकेज) नंदूरबार जिल्हयात सन २०१०-११ या आर्थिक वर्षात आदिवासी उपयोजनेतून मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास या राज्यस्तरीय योजनेंतर्गत "शेततळे" योजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

तसेच याकरीता रु. ७०.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर रु. ७०.०० लाख इतका निधी (रु. सत्तर लाख फक्त) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी मासिक कॅश फ्लो प्रमाणे खर्च करण्यात यावा व मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

३. नंदूरबार जिल्हयातील सदर शेततळयांच्या योजनेकरीता आदिवासी उपयोजनेतून मंजूर/उपलब्ध करुन देण्यात आलेला रु. ७०.०० लाख निधी फक्त त्या जिल्हयातील आदिवासी ( अनु. जमाती) लाभार्थ्यांकरीताच खर्च करण्यात येईल याची संचालक. (मृदसंधारण ) यांनी दक्षता घ्यावी. तसेच राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा व झालेल्या खर्चाचा आर्थिक / भौतिक तपशीलासह अहवाल या विभागास व आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक यांना सादर करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर योजना केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजनेतर्गत सुरु असलेल्या "शेततळे" योजनेप्रमाणेच राबविण्यात यावी.

५. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्रमांक- टी-६** ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना.(०१)- जनजाती क्षेत्र उपयोनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०१) मृद संधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास ( ४४०२ १०१२) ५३, मोठी बांधकामे

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. **२०११०३०९१६४५०७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( श्या. र. चौरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री ( आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव,
प्रधान सचिव ( जलसंधारण ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (आदिवासी विकास विभाग) मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (नियोजन विभाग) मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (कृषि विभाग) मंत्रालय, मुंबई
आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
विभागीय आयुक्त, नाशिक
संचालक मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, म.रा. पुणे.
जिल्हाधिकारी, नंदूरबार
विभागीय कृषि सहसंचालक, नाशिक
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, नंदूरबार
जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार
महालेखापाल ( लेखापरीक्षा) महाराष्ट्र १ व २, मुंबई, नागपूर,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, मुंबई, नागपूर,
उ. स. (जलसंधारण ) मंत्रालय, मुंबई
क.अ. (जल-११) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, जल-१२